# छोटा वुल्फ

नथानिएल बेंचले, चित्र : जोआन



मराठी : अश्विनी बर्वे

# छोटा वुल्फ

नथानिएल बेंचले, चित्र : जोआन

मराठी : अश्विनी बर्वे





छोटा वुल्फ आपल्या परिवारा बरोबर नदीच्या किनाऱ्यावरील एका गावात राहत होता.

त्याची आई मका पिकवत असे आणि स्वयंपाक करत असे आणि त्याचे वडील शिकार करत असत.



त्याचे वडील हरणं, अस्वले आणि खाण्यासाठी छोट छोट्या प्राण्यांची शिकार करत असत. जे ते खात नसत त्यांच्या पासून ते कपडे शिवत.

पण छोटा वुल्फ शिकार करण्यासाठी खूप छोटा होता. तो आपल्या होडीतून केवळ मासे पकडत असे.

आणि तो विणलेले जाळे टाकून मासे पकडत असे. तो ईल पकडत असे आणि तो गोगलगाय आणि शिंपले शोधत असे.

त्याचे जीवन चांगले होते, आणि त्याला मासे पकडायला आवडत असे.





तो हाड गळाला लावून मासे पकडत असे.

पण काही काळानंतर तो मासे पकडून थकला.

आता त्याला मोठ्या जानवरांची शिकार करावी वाटत होती.

त्याने आपल्या वडिलांकडे ती परवानगी मागितली.

“शेवटी,” तो म्हणाला, “काय होईल? माझे एक दोन बाण हरवतील, बस एवढंच ना.”

"ठीक आहे,“ त्याचे वडील म्हणाले.

"नदीच्या खालच्या बाजूला पहाडावर तुला चांगली शिकार मिळेल.



तू आपली होडी घेवून जा, आणि तिथं एक रात्र आणि एक दिवस रहा,मग बघ तुला तिथं काय मिळतं”

"ठीक आहे!" छोटा वुल्फ म्हणाला. तो आपल्या छोट्या होडीत बसून मॅनहॅटनला गेला जिथं पहाड होते.

“जर मी इथं चांगली शिकार केली,” त्याने विचार केला, “आणि खूपसारे हरणे, अस्वले,कोल्हे, लांडगे, गरुड, मुंगुस, आणि उदमांजर आणि जंगली मांजरं यांची शिकार केली तर मग मी वडीलांसारखा शिकारी होईन.”



“मग मी वडिलांसारखे माझ्या केसांत पंख आणि चेहऱ्यावर रंग लावू शकेन.”



त्याला अजून हे माहित नव्हते की वडिलांसारखा माणूस फक्त जनावरांची शिकार करून होत नाही तर त्यापेक्षा अधिक काही करत असतो.

मॅनहॅटनवर शिकार आणि मासे पकडणारे इतर इंडियंस पण होते, पण छोटा वुल्फ एकटा राहू इच्छित होता.

जेव्हा अंधार झाला तेव्हा छोट्या वुल्फने झोपण्यासाठी तंबू ठोकला आणि मग शेकोटी पेटवली.



म्हणून त्याने आपली छोटी होडी किनाऱ्यावर खेचली आणि तिला लपवून ठेवलं आणि मग तो जंगलात निघून गेला.

त्याने एक छोटी चिमणी भाजली जिची त्याने शिकार केली होती. आणि मग तो झोपला.

पण त्याला झोप आली नाही, कारण जंगलात रात्री अनेक गोष्टी होत होत्या.





जंगल अनेक आवाजांनी भरून गेले होते-

वू- हू! ओ-ओ! ओ!

तुटण्याचा-पडण्याचा! थप आवाज येत होता.

जंगल अनेक जीवांच्या डोळ्यांनी भरलेले होते.

छोटा वुल्फ दिवस उजाडे पर्यंत झोपू शकला नाही.



जेव्हा तो जागा झाला तेव्हा त्याने जंगलाच्या मधून जाणारी एक पायवाट बघितली.

“मला वाटतं मी या पायवाटेवरून जावं आणि बघावं ही वाट कुठे जाते,” तो म्हणाला.
“कदाचित ती मला तिथं घेवून जाईल जिथं शिकारीसाठी चांगले प्राणी आहेत.”

मग त्याने चांगल्या नशिबासाठी "हां-हू!" म्हटलं आणि बरोबर काही लिंबे घेऊन तो पुढे गेला. आता तो कोणत्याही गोष्टीसाठी तयार होता. पण पुढे जे काही झाले त्यासाठी मात्र तो तयार नव्हता..तो जंगलातून बाहेर पडला आणि त्याने जे काही पाहिलं त्यावर त्याचा विश्वास बसला नाही..



त्याने जी गोष्ट बघितली होती, ती त्याने याआधी कधी बघितली नव्हती- धुराडे असणारी घरे आणि शिडाची जहाजे आणि चार पाती असणारे घर, जे गोल गोल फिरत होते. आणि एक माणूस ज्याचा चेहरा पूर्णपणे पांढरा होता.



माणसाचा जबडा मोठा होता आणि दातांच्या मध्ये फटी होत्या.छोट्या वुल्फला वाटले की जसे काही त्या माणसाने एखाद्या सैतानाचा मुखवटा घातला आहे.



त्याने एका जहाजातून अजब जनावरांना बाहेर येतांना पाहिलं.

लांब आयाळ आणि शेपूट असणारे घोडे आले. छोटी शिंगं आणि काळे धब्बे असणाऱ्या गायी आल्या. कुरळे केसांची आणि काळ्या चेहऱ्याच्या मेंढ्या बाहेर आल्या. डुक्करे आली ज्यांची शेपूट वर्तुळाकार आणि नाक टोकदार होते. ते जनावरे मोठे आणि अजब होते, आणि ती चित्रंविचित्र आवाज काढत होते.

छोटा वुल्फ घाबरला. “मी अशा प्रकारच्या जनावरांची शिकार करायला आलो नव्हतो,” तो म्हणाला. “ते माझ्यासाठी खूप जास्त आहेत!” आणि मग तो परत जंगलात पळाला.

तो पायवाटेने पळत परत आला आणि त्याने आपली होडी शोधली. मग तो होडीत बसून पळाला आणि मॅनहॅटन पासून जितकं शक्य होईल तितका लवकर लांब गेला.



छोट्या वुल्फने घरी पोहचल्यावर आपल्या वडिलांना त्याने जे पाहिलं ते सगळं सांगितलं.



“मी एका माणसाला पांढऱ्या रंगाने रंगलेलं पाहिलं!” तो म्हणाला.

“त्याचे हात आणि चेहरापण सफेद होता. आणि त्याचा जबडा मोठा होता, आणि त्याचे दात जादूटोणा करणाऱ्या भुतासारखे किंवा सैतानासारखे होते.”

“मला गोऱ्या लोकांविषयी माहिती आहे,” त्याचे वडील म्हणाले.

“ते लोक काही काळापूर्वी इथं आले होते.जर आपण त्यांना एकटं सोडलं तर ते ठीक होईल.”

“पण तिथं तमाम जनावरं पण होती!” छोटा वुल्फ म्हणाला.

“अशी जनावरं जी आपण कधी बघितलीही नाहीत!



काहींना अशी सरळ शिंगं होती, काहींचे शिंग वाकडे होते.

आणि काही प्राण्यांना झुपकेदार शेपूट होती, आणि काहींची कुरळी शेपूट होती, आणि ते सगळे चित्रंविचित्र आवाज काढत होते. जोपर्यंत तुम्ही त्यांना बघत नाही तोपर्यंत तुम्ही विश्वास ठेवणार नाही.”

"ठीक आहे,“ त्याचे वडील म्हणाले.

“तू केलेलं वर्णन जास्तच मनोरंजक वाटतं आहे. मी तुझ्यासारखं जाऊन बघेन.”

“मनोरंजक?" छोटा वुल्फ म्हणाला. “ते भयानक आहे! जरा थांबा!”

“ते बघा!” छोट्या वुल्फने शहरात गेल्यावर म्हटलं.

“तिथं जनावरं आहेत! तुम्ही कधी त्यांच्यासारखं काही बघितलं आहे?”

“ते फारच विचित्र आहेत,” वडील त्याच्या म्हणण्याशी सहमत झाले.





मग ते होडी घेवून परत मॅनहॅटनला गेले.

“या आपण कोणाला तरी विचारू आणि बघू त्यांच्याबाबत काही माहिती मिळू शकते का?

मग ते एका गोऱ्या व्यक्तीजवळ गेले,तो त्यांना बघून दचकला!

त्याने आपली बंदुक उचलली आणि ती एकदम तयार ठेवली..

“ती जनावरे कोणासाठी आहेत?” छोट्या वुल्फच्या वडिलांनी विचारलं.

“ती जनावरे आमच्या फार्म साठी आहेत,” गोरा माणूस म्हणाला.

“तुम्ही इथून गेला तर चांगलं होईल.”



“ही जमीन आता आमची आहे. आम्ही पैसे देवून ती खरेदी केली आहे.”

“तुम्ही जमीन कशी खरेदी करू शकतात?” छोट्या वुल्फच्या वडिलांनी विचारलं.

“तुम्ही आकाश वा समुद्र खरेदी करू शकतात का? तुम्ही जमिनीसाठी कोणाला पैसे दिले?”

“आम्ही इथे राहणाऱ्या इंडियन्स ना पैसे दिले,” गोरा माणूस म्हणाला.

“ते तलावात मासे पकडत होते. अच्छा ,आता तुम्ही लोक जा,नाही तर मी तुम्हांला गोळी मारेन.”

मग  गोरा माणसाने आपल्या बंदुकीकडे इशारा केला, आणि त्याने क्लिक करत ती उचलली.

“तुम्हांला आम्हांला घाबरण्याची गरज नाही,” छोट्या वुल्फचे वडील म्हणाले.

“आम्ही तर फक्त तुम्हांला विचारत होतो.”



“इथून त्वरित निघ,” गोरा माणूस म्हणाला.

त्यानंतर छोटा वुल्फ आणि त्याचे वडील तिथून निघून गेले.

“त्यांनी कोणत्या इंडियन्सन पैसे दिले? छोट्या वुल्फने होडी वल्हवत विचारले.

'कॅनारसीला“, त्याचे वडील म्हणाले, “आणि ते तर तिथे रहात ही नाहीत.

त्यांना जमीन विकण्याचा कोणताही अधिकार नव्हता. ज़मीन, आकाश आणि समुद्र धरती मातेचे आहेत आणि सगळ्याच्या उपयोगासाठी आहे.



पण गोरे लोकं याकडे असे बघत नाहीत.

गोऱ्यांची जनावरे सगळीकडे जात आहेत आणि इंडियंसनी लावलेली पीकं खात आहेत, इंडियंसची शेते तुडवतात.



त्यांनी अनेक घरे बांधली आणि आता ते पूर्ण टापूवर पसरले आहेत.

शेवटी इंडियंसच्या तुलनेत गोरे लोक आणि त्यांच्या जनावरांची संख्या अधिकच होती.

त्यामुळे इंडियंसनला धान्य पिकवणे कठीण जात होते, आणि त्यामुळे ती भुकेली राहत.



इंडियंस ज्या जनावरांची शिकार करत होते, ती आता निघून गेली होती..

एक दिवस छोटा वुल्फच्या वडिलांनी निर्णय घेतला.

“मी जावून गोऱ्या लोकांच्या नेत्यांना भेटतो,” ते म्हणाले.

“मी त्यांना सांगेन की ते लोक आमची भूमी खराब करत आहेत आणि मी त्यांना ते थांबवण्याची विनंती करेन. त्यांनी अशा प्रकारे जमीन नष्ट करायला नको.”

“मी तुमच्या बरोबर येवू शकतो का?” छोटा वुल्फने विचारले.



“हो," त्याचे वडील म्हणाले.

“मी हे तुझ्या भल्यासाठी करत आहे.”

त्यानंतर ते गोऱ्यांच्या नेत्याला शोधण्यासाठी बाहेर पडले, खूप दूर जाण्याच्या आधी त्यांना एक किंकाळी ऐकू आली आणि लोकांना पळतांना त्यांनी पाहिलं. आणि मग छोटा वुल्फच्या मागच्या झाडाच्या मागे धमाका झाला.

थोड्याच अंतरावर त्यांनी लोकांना ओरडतांना ऐकले, "इंडियंस! इंडियंस!"



"अरे!" छोटा वुल्फने विचारले. “हे काय होत आहे?”

“मला नाही माहित,” त्याचे वडील म्हणाले. “आता उभा रहा आणि ऐक.” त्यांनी जे काही होत होतं ते ऐकलं.

मग त्यांनी अधिक ओरडण्याचा आवाज ऐकला.मग अजून एक धमाका! त्यामुळे झाडाच्या सालीचा तुकडा उडाला.

“ते आपल्यावर गोळ्या चालवत आहे!” छोटा वुल्फ ओरडला.





छोटा वुल्फ एका झाडाच्या मागे लपला, आणि त्याच्या वडिलांनीही तसंच केलं.

“त्याबाजूला काहीतरी आहे,” त्याचे वडील आपली सहमती देत म्हणाले.

“पण त्याला काही अर्थ नाही.“

त्यांनी आपल्या तोंडावर हात ठेवत म्हटले, “आम्हांला बोलायचं आहे! तुमचा नेता येवून आमच्याबरोबर बोलेल का?”

"तुम्ही इंडियंस! इथून पळा!" जंगलातून कोणीतरी ओरडले.

"तुम्ही तिथं परत जा जिथं तुम्ही राहतात!"

अजून एक तिसरी गोळी चालवली आणि ती छोट्या वुल्फच्या कानाच्या मागून जोरात गेली.



"मला वाटते," त्याचे वडील म्हणाले, "ते आमच्याशी बोलू इच्छित नाही. चल आपण परत जाऊ."



त्यानंतर ते परत गेले आणि दुसऱ्या दिवशी वडिलांनी अजून एक निर्णय घेतला.

“इथे सगळ्यांसाठी भरपूर जमीन आहे,” ते म्हणाले, “जर आपण इथे राहू शकत नाही, तर आपण नदीच्या वरच्या बाजूला आणखीन पुढे जाऊ या.”

आणि जर आपण खूप दूर गेलो, तर ते आपल्यापर्यंत कधी पोहचणार नाही.”

म्हणून त्यांनी आपले सामान बांधले आणि अशा जागा शोधायला निघाले जिथे गोरे लोक पोहचू शकणार नाही.

त्यांना एक चांगली जागा मिळाली आणि ते तिथे राहू लागले.

मग एक दिवस, जेव्हा छोटा वुल्फ शिकार करत होता, तेव्हा त्याने विचार केला की त्याने एक हरिण पाहिले आहे.

त्याने जवळ जावून बाणाने नेम धरला.



मग त्याने पाहिले की ते एक हरिण नव्हते. ती एक गाय होती.

त्याने घरी जाऊन आपल्या वडिलांना सांगितले.

“काही त्रास होण्याच्या आधी इथून आपण पुढे जाऊ.”



“याचा अर्थ ते इथेपण

अजून पुढे ....



आणि परत ....



आणि परत !!!

## लेखकाची नोट

खरेतर ही काल्पनिक कहाणी मॅनहॅटनच्या बाबत आहे. छोटा वुल्फ आणि त्याचे वडील त्या अमेरिकी इंडियंस मधून कोणीपण असू शकतात. ज्यांना गोऱ्या लोकांनी त्यांच्या घरातून आणि शिकारींच्या ठिकाणापासून विस्थापित केलं होतं. कॅनरसी इंडियंसने, ज्यांनी मॅनहॅटन डच गोऱ्यांना 'विकले' होते, त्यांच्याजवळ त्या भूमीचा कोणताही अधिकार नव्हता.- कारण ते ब्रुकलिन क्षेत्रात राहत होते- आणि त्यांच्यासाठी जमिनीचा मालक होण्याचा विचार आकाश वा जमिनीचा मालक होण्यापेक्षा अधिक नव्हता. त्यांनी डच लोकांनी दिलेले धन खुशीने घेतले, पण लवकरच त्यांना जाणवले की गोऱ्या लोकांचा संपत्ती बद्दलचा विचार त्यांच्या आपल्या विचारा पेक्षा एकदम वेगळा होता. ही गोष्ट परत परत घडली,जोपर्यंत अमेरिकी इंडियंस जवळ विकण्यासाठी काहीच राहिलं नाही.